**कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे आणि महामंडळाचे अंतर्गत लघुपाटबंधारे कक्ष, ठाणे या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील एकूण ५५ पदांना दिनांक १.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ मंजुर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : मुदवा-२०२४/(प्र.क्र.१६/२४)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२४

**पहावे :-**

१) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक मुदवा-२०२३/(प्र.क्र.१५३/२३)/ खारभूमी, दि.०५.१०.२०२३.

२) कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या कार्यालयाचे क्र. कोंपाविम/मुदतवाढ/ आ- ३/२६९/ सन २०२४, दिनांक २९.०१.२०२४ रोजीचे पत्र व सहपत्र

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - पदनि-२०१६ /प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे आणि महामंडळाचे अंतर्गत लघुपाटबंधारे कक्ष, ठाणे या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील एकूण ५५ पदांना संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०५.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ मंजूर करण्यात आली होती. त्यानुसार कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या कार्यालयातील ४१ पदांना आणि महामंडळाचे अंतर्गत लघुपाटबंधारे कक्ष, ठाणे या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील १४ पदे असे एकूण ५५ पदांना दिनांक २८.०२.२०२४ च्या पुढे मुदतवाढ मंजूर करण्याबाबत संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दिनांक २१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या कार्यालयातील ४१ पदांना आणि महामंडळाचे अंतर्गत लघुपाटबंधारे कक्ष, ठाणे या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील १४ पदे असे एकूण ५५ पदांना सोबतच्या परिशिष्ट "अ" येथे दर्शविल्याप्रमाणे पुढील अटीच्या अधीन राहून दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ याद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

अ) नियत अस्थायी पदे ६ महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसावी.

ब) नियत अस्थायी आस्थापनेवरील पदे ही दिनांक ०६.०२.२००३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर सुधारित आकृतीबंधानुसार ४५२९७ पदांच्या मर्यादेत असावीत.

२. वरील कार्यालयांच्या आस्थापनेवर होणारा खर्च “मागणी क्रमांक आय-५ ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूकीचा (०४) वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (योजनेत्तर) (०४) (०३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (अनिवार्य) (४७०१ आय-१८९)” या लेखाशिर्षाखाली टाकून तो मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक -पदनि-२०१६ /प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३०७१२३४४४६८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सहपत्र :- परिशिष्ट "अ "**

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.07 12:43:58 +05'30'

**( वर्षा भगत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत सहपत्रासह :-**

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
अवर सचिव (आ. पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२.
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश, मुंबई
अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
कक्ष अधिकारी, अर्थ-२/आ(पुनर्रचना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

## परिशिष्ट - "अ"

## (शासन निर्णय क्र मुदवा-२०२४/प्र.क्र.१६/खारभूमी, दि.०७ मार्च,२०२४ चे सहपत्र)

| अ.क्र | महामंडळ/विभाग/उपविभाग | नियत अस्थायी पदांचा तपशिल | पदसंख्या |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १) | कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे. | १) कार्यकारी संचालक | १ |
| | | २)मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ |
| | | ३) कार्यकारी अभियंता | १ |
| | | ४) उपअभियंता | २ |
| | | ५) लेखा अधिकारी | १ |
| | | ६) सहाय्यक लेखा अधिकारी | २ |
| | | ७) कनिष्ठ अभियंता/शा.अ. | ८ |
| | | ८) स्था.अ.सहा | ८ |
| | | ९) वरिष्ठ लिपिक | २ |
| | | १०) कनिष्ठ लिपिक/लिपिक टंकलेखक/टंकलेखक | ५ |
| | | ११) अनुरेखक | २ |
| | | १२) वाहन चालक | २ |
| | | १३) शिपाई | ४ |
| | | १४) चौकीदार | २ |
| | | **एकूण** | **४१** |
| २) | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे कक्ष, ठाणे. | १)कार्यकारी अभियंता | १ |
| | | २) उप अभियंता | २ |
| | | ३) कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता | ४ |
| | | ४) लघु टंकलेखक/निम्नश्रेणी लघुलेखक | १ |
| | | ५) वरिष्ठ लिपिक | १ |
| | | ६) कनिष्ठ लिपिक/लिपिक टंकलेखक/टंकलेखक | १ |
| | | ७) अनुरेखक | १ |
| | | ८) शिपाई | २ |
| | | ९) चौकीदार | १ |
| | | **एकूण** | **१४** |
| | | **एकूण** | **५५** |

VARSHA SANDEEP BHAGAT

Digitally signed by VARSHA SANDEEP BHAGAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b200b2df2a6c4331b4a626db8cf6d32f7b30a2c5514afe21882df51ab8cdaad2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2711C10FA6CF7DA605799BE6228F533334F260EDEE79F096333766DAB604E021, cn=VARSHA SANDEEP BHAGAT
Date: 2024.03.07 12:44:49 +05'30'

( वर्षा भगत )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**